सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत रस्ते दुरुस्ती/ सुधारणा (राज्य स्तर) योजनेंतर्गत निधी वितरण
(लेखाशीर्ष ३०५४ २७२२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.१३/का-६**
मादाम कामा रोड, महात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ जूलै,२०२३

**वाचा**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.जिरस्ते १२२३/प्र.क्र.१७४/का-५.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदीतुन जिल्हा परिषदेच्या अखत्यारीतील आदिवासी क्षेत्रातील रस्ते दुरुस्ती / सुधारणांच्या कामांना (लेखाशिर्ष ३०५४ २७२२) अंतर्गत सन २०२३-२४ या वर्षात रु.१००००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीतून आदिवासी क्षेत्रातील नाशिक जिल्हयातील रस्ते दुरुस्ती / सुधारणांच्या भैतिकदृष्ट्या पुर्ण झालेल्या/प्रगतिपथावरील कामांकरीता वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेत निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०२३-२४ आर्थिक वर्षाकरीता मागणी क्रमांक टी-५ मुख्य लेखाशिर्ष ३०५४- मार्ग व पुल, (०४)-जिल्हा व इतर मार्ग, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)-जनजाति क्षेत्रांतर्गत योजना, (०१) (०६) (राज्य स्तर योजना) (कार्यक्रम खर्च), (लेखाशिर्ष ३०५४२७२२), २७-लहान बांधकामे याखाली रु.१००००.०० लाख इतकी तरतुद अर्थसंकल्पीत आहे. सदर तरतुदीतून नाशिक जिल्ह्यातील रस्ते दुरूस्तीच्या सोबतच्या विवरणपत्रातील कामांना कामनिहाय एकुण रु.१०००.०० लाख इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना खालीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) सदर वितरीत निधीतुन भौतिकदृष्टया पुर्ण असलेल्या व प्रगतीपथावरील प्रलंबित दायित्व असलेल्या सोबतच्या यादीतील **२७** कामांवरच व प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच निधी खर्च करण्याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

२) सोबतच्या यादीत नमुद केल्याप्रमाणे कामनिहाय निधी खर्च करण्यात यावा, यामध्ये कोणत्याही प्रकारे बदल करण्यात येऊ नयेत. तसेच सदरची कामे इतर कोणत्याही योजनेमधुन मंजुर नसल्याची अथवा सदर कामांची द्विरुक्ती होत नसल्याची संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३) संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी सदरची तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील कामांवरच खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

४) सदर कामांसाठी निविदा प्रक्रीया राबविण्यापुर्वी सदरची कामे आदिवासी उपयोजना क्षेत्र (TSP) / अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र (ATSP) माडा (MADA) /मिनी माडा (MINI MADA)/ पेसा (PESA) क्षेत्रात मोडत असल्याबाबत संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावी. सदरची कामे आदिवासी उपयोजना क्षेत्र/अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र/माडा/मिनी माडा/पेसा क्षेत्रात मोडत नसल्यास सदर कामे सुरु करण्यात येऊ नये, अशी कामे रद्द करण्यासाठी शासनास तात्काळ कळविण्यात यावे.

५) प्रस्तुत काम इतर योजनेतून यापूर्वी करण्यात आलेले नाही किंवा सद्यस्थितीत अन्य योजनेत मंजूर नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी. सदरची कामे अन्य योजनेत मंजूर असल्यास सदर कामे सुरु करण्यात येऊ नये, अशी कामे रद्द करण्यासाठी शासनास तात्काळ कळविण्यात यावे.

६) प्रस्तुत कामास कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी शासनाने वेळोवेळी या संदर्भात निर्गमित केलेली परिपत्रक व मार्गदर्शक सुचनांचे अनुपालन करण्यात आलेले आहे, याची खातरजमा करुन घेण्यात यावी.

७) सदर कामांना प्रशासकीय मान्यता देतांना आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. टिएसपी-२००३ /प्र.क्र.१०१/का.६. दि. २६ जुलै, २००४. क्र. टिएसपी २००५/प्र.क्र.५९/का- ६.

दि.१० नोव्हेंबर, २००५ व क्र.अनुक्षे- २०१९/प्र.क्र.८१/का-१४. दि. ०९/०८/२०१९ मधील अटीचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

८)उपरोक्त अटींची पूर्तता करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद यांची राहील. तसेच, अटींचे उल्लंघन केल्यास याबाबतची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद यांची राहील.

९)उपरोक्तप्रमाणे अटी-शर्तीनुसार निकष पूर्ण न करणाऱ्या कामांना कार्यारंभ आदेश प्रदान करण्यात येऊ नयेत.

१०)वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकातील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

११)आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या सदरच्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय अहवाल संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी विकास विभागास यांना सादर करावा.

१२)सदर कामांना दर्शविण्यात आलेली अंदाजित किंमत ही ढोबळमानाने दर्शविण्यात आलेली आहे. तथापि,सविस्तर अंदाजपत्रकानुसार सदर कामाची किंमत या कामांना दर्शविण्यात आलेल्या किंमतीपेक्षा कमी आल्यास तसे शासनास अवगत करण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३१८२७२३११२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.07.07 19:25:03 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई..

२) अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई.

४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

५) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, मंत्रालय, मुंबई.

६) अपर आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक.

७) जिल्हाधिकारी, नाशिक.

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक

९) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

१०) संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

११) कार्यासन अर्थ-१९/व्यय-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) कार्यासन-५ , आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

१३) निवड नस्ती कार्यासन -६(अर्थसंकल्प शाखा), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

| शासन निर्णय, आ.वि.वि. क्र-बीयुडी.२०२३/प्र.क्र.१३/का.६,दि.०७ जुलै,२०२३ सोबतचे विवरणपत्र | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु. लाखात) |
| अ .क्र. | कामाचे नांव | प्र. मा . किंमत | सदर शानि . अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| १ | वरची वार्षी ते सोनवणेवस्ती रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१०७ ) किमी ०/०० ते १/५०० तादेवळा., जिनाशिक. | ५०.०० | ४१.८४ |
| २ | रामा-२० ते खुंटेवाडी रस्ता सुधारणा व रुंदीकरण करणे -ग्रामा) ०४) किमी ०/०० १/००, तादेवळा., | ५०.०० | ३४.६९ |
| ३ | फांगदरवस्ती ते रामा-२७ रस्ता सुधारणा करणे (ग्रामा-१८) कि .मी.०/०० ते २/०० तादेवळा. | ५०.०० | ३९.५५ |
| ४ | सावकी ते मांगबारी रस्ता सुधारणा करणे (ग्रामा-७३) कि .मी. ०/०० ते ५/०० तादेवळा. | ५०.०० | ३८.३२ |
| ५ | सावकी ते खामखेडा रस्त्याची सुधारणा करणे कि .मी.३/०० ते ५/०० तादेवळा. | ३५.३० | २४.५१ |
| ६ | इजिमा २०४ ते भऊर रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)९२) कि .मी. ०/०० ते ४/०० तादेवळा . | ५०.०० | ३८.३४ |
| ७ | खामखेडा गाव ते चौफुली रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१९) कि .मी. ०/०० ते ०/७०० तादेवळा . | ५०.०० | ३५.७२ |
| ८ | सावकी ते सावकी पाडा रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)६५) कि .मी. ०/०० ते ०/७०० तादेवळा . | ५०.०० | ३५.७२ |
| ९ | खामखेडा ते लायकेश्वर रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)२८) कि .मी. ०/६०० ते २/५०० तादेवळा . | ५०.०० | ४७.०० |
| १० | सावकी ते राणेदेव नगर रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)२१) कि .मी. ०/०० ते १/५०० तादेवळा . | ४०.०० | २८.०३ |
| ११ | पिंपळगाव ते खालप रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)११३) कि .मी. १/०० ते ३/०० तादेवळा . | ५०.०० | ३४.९५ |
| १२ | शिवनाला ते इजिमा २०४ ला मिळणारा ग्रामा ९२ रस्ता ०/०० ते २/०० रस्ता सुधारणा करणे तादेवळा. | ५०.०० | ३८.३६ |

| शासन निर्णय, आ.वि.वि. क्र-बीयुडी.२०२३/प्र.क्र.१३/का.६,दि.०७ जुलै,२०२३ सोबतचे विवरणपत्र | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु. लाखात) |
| अ .क्र. | कामाचे नांव | प्र. मा . किंमत | सदर शानि . अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| १३ | खुंटेवाडी ते खालप रस्ता ग्रामा ४ किमी ०/००ते २/०० सुधारणा करणे तादेवळा. | ५०.०० | ३७.५१ |
| १४ | शेरी ते रोहीदास वस्ती रस्ता सुधारणा करणे तादेवळा. | ५०.०० | ४७.०० |
| १५ | खुंटेवाडी ते स्मशानभुमी देवळवाडी रस्ता ग्रामा ८ तादेवळा. | ५०.०० | ३९.०१ |
| १६ | खामखेडा ते स्मशानभुमी रस्ता सुधारणा करणे ग्रामा १० तादेवळा. | ५०.०० | ३८.३८ |
| १७ | खर्डे ते वार्षी हनुमंतपाडा रस्ता सुधारणा करणे इजिमा-२८ तादेवळा. | १०.०० | ९.४० |
| १८ | खामखेडा ते काळखडी वस्ती रस्ता सुधारणा करणे किमी ०/०० ते १/५०० तादेवळा. | ५०.०० | ३८.३६ |
| १९ | प्रजिमा६- ते बर्डा मोटीचा गावठा रस्ता सुधारणा करणे ग्रामा २० किमी २०/०० ते २१/०० तासुरगाणा. | ३७.०० | २३.५३ |
| २० | प्रजिमा ४ ते मांजरपाडा रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)०५) कि .मी. ५/०० ते ७/०० तासुरगाणा . | ५०.०० | ३४.६९ |
| २१ | प्रजिमा ते हरणटेकडी डांगराळे रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१५) कि .मी.०/०० ते २/५०० ता. सुरगाणा | ५०.०० | ४७.०० |
| २२ | रामा-१५३ ते चिखली रोटी रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)८४) कि .मी.१/०० ते ३/०० तासुरगाणा . | ५०.०० | ३४.६९ |
| २३ | प्रजिमा-२ ते रोटी धोडांबे रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१६) कि .मी. १/०० ते ३/०० ता. सुरगाणा | ५०.०० | ४७.०० |
| २४ | नागशेवडी ते सुळपाडा रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१६ ) कि .मी. ४/०० ते ६/०० तासुरगाणा . | ५०.०० | ३४.६९ |
| २५ | शिंदे ते पायरपाडा रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१९ ) कि .मी.५/०० ते ७/०० तासुरगाणा . | ५०.०० | ४७.०० |

| शासन निर्णय, आ.वि.वि. क्र-बीयुडी.२०२३/प्र.क्र.१३/का.६,दि.०७ जुलै,२०२३ सोबतचे विवरणपत्र | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु. लाखात) |
| अ .क्र. | कामाचे नांव | प्र. मा . किंमत | सदर शानि . अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| २६ | इजिमा-८० ते  कहानडोळ रस्ता सुधारणा करणे (ग्रामा-१०३ ) कि .मी.०/०० ते १/५०० तासुरगाणा . | ५०.०० | ३४.६९ |
| २७ | गोपाळपूर ते पिंपळचोंड रस्ता सुधारणा करणे -ग्रामा)१२७) कि .मी. ०/०० ते २/०० तासुरगाणा . | ५०.०० | ४७.०० |
| **२७** | **एकूण** | **१२७२.३०** | **९९६.९५** |

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.07.07 19:25:23 +05'30'